उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिपत्याखालील स्त्री रुग्णालय, नेकनूर जि.बीड येथील ८२ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.८९/आरोग्य-४**
१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: २ मे, २०१५.

वाचा

1. **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः पदआ-२००६/प्र.क्र.१९/आरोग्य-३, दि.६.०२.२००८.**
2. **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१४/प्र.क्र.६३/आरोग्य-४, दि.१७.०४.२०१४.**
3. **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तिय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१५.**
4. **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५/स्त्री. रु.नेकनूर/अपदे-८२/सन२०१५-१६/२२५०-५१/१५, दि.२१.०२.२०१५.**

प्रस्तावना

उपसंचालक, आरोग्य सेवा,लातूर मंडळातील स्त्री रूग्णालय, नेकनूर, जि.बीड येथील ८२ अस्थाई पदांचा विभागाच्या आकृतीबंधात समावेश झाला नसल्याने संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये ८२ अस्थाई पदांना दि.१.०३.२०१४ ते दि.२८.०२.२०१५ या कालावधीपर्यंतची मुदतवाढ देण्यात आलेली आहे. या पदांना दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

उपसंचालक, आरोग्य सेवा,लातूर मंडळातील स्त्री रूग्णालय, नेकनूर, जि.बीड येथील सोबतच्या विवरणपत्रातील ८२ अस्थाई पदांना खालीलप्रमाणे अटींच्या अधीन राहून दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

1. या पदांपैकी एकही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असल्याचे आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिका-यांची राहील.
2. सदर पदांबाबत यापुढील मुदतवाढीचा प्रस्ताव सादर करताना पदांच्या आढाव्याच्या संबंधी पुर्तता करण्यात याव्यात.

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष “ २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०-रूग्णालये व दवाखाने-पंचवार्षीक योजनांतर्गज योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०६) (०१)-

मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रूग्णालये व दवाखाने ( २२१० ०२२६) " करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ )( २००४)/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ व क्र.पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तिय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४३०१३१८२९५६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.11 12:54:47 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, बीड.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
९. वैद्यकीय अधिक्षक, स्त्री रुग्णालय, नेकनूर, जि.बीड
१०.वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
११.अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).